मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशिका देण्यासाठीच्या VPMS प्रणाली राबविणा-या मे.सुमीत फॅसिलिटिज लि. कंपनीच्या १६ कंत्राटी कर्मचा-यांचे मानधन व व्यवस्थापन खर्च याकरिता दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक ३१.०३.२०२४ या कालावधीसाठीचे देयक अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीईएस- ०२२४/ प्र.क्र.८०/विशा-४.**
दुसरा मजला,मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-**

मंत्रालयात येणा-या अभ्यांगतांना प्रवेशपास देण्याकरिता दिनांक १५.०१.२०१५ पासून मंत्रालयाच्या प्रवेशव्दारावर महाऑनलाईन कंपनीकडून कार्यरत असलेली व्हिजिटर पास मॅनेजमेंट सिस्टित (VPMS) प्रणाली माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत सुरु करण्यात आली. सदर प्रणाली माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने दिनांक १३.०१.२०१६ पासून गृह विभागाकडे सुपूर्द केली आहे. त्यानुसार मंत्रालयात येणा-या अभ्यांगतांना प्रवेशपास देण्याकरिता मंत्रालयाच्या प्रवेशव्दारावर व्हिजिटर पास मॅनेजमेंट सिस्टिम (VPMS) प्रणाली आपल्या ही मे.सुमित फॅसिलिटिज् लि.,पुणे या कंपनीमार्फत राबविण्यात येत आहे. सदर कंत्राट दिनांक १५.०८.२०२२ रोजी संपुष्टात आले. तद्‌नंतर मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशिका देण्याबाबत प्रणालीसाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ व हार्डवेअर, तांत्रिक सुविधा, उपकरणे इ. सर्व साधनसामुग्री पुरविणेबाबत ई-निविदा प्रक्रिया राबविण्याचा निर्णय घेण्यात आला.

त्यानुसार मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशिका देण्याबाबत प्रणालीसाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ व हार्डवेअर, तांत्रिक सुविधा, उपकरणे इ. सर्व साधनसामुग्री पुरविणेबाबत ई-निविदा ही महाराष्ट्र शासनाच्या http://mahatenders.gov.in च्या संकेतस्थळावर दिनांक ०६.०७.२०२३ रोजी Online पध्दतीने प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर निविदा प्रक्रियेव्दारे शासनाच्या दिनांक २३.०८.२०२३ च्या कार्यरंभ आदेशान्वये मंत्रालय व नवीन प्रशासन भवन येथे प्रवेश करणा-या अभ्यागतांना प्रवेशपास देण्यासाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ व व हार्डवेअर, तांत्रिक सुविधा, उपकरणे इ. सर्व साधनसामुग्री पुरविण्यासाठी दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२६ (एकूण ३ वर्षे) या कालावधीकरिता न्युनतम सेवा पुरवठादार म्हणून M/s.Sumeet Facilities Ltd कंपनीची निवड करण्यात आली. त्यानुसार मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे यांच्या कंपनीतर्फे कार्यरत असलेल्या १६ कंत्राटी कर्मचारी यांनी दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक ३१.०३.२०२४ या कालावधीसाठी केलेल्या कामाचे मानधन व व्यवस्थापन खर्च यासाठी येणा-या खर्चापोटी रु.२४,३८,७१६/- (रुपये चोवीस लक्ष अडतीस हजार सातशे सोळा फक्त) इतक्या रकमेचे देयक अदा करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-** मंत्रालय अंतर्गत सुरक्षा व्यवस्था अधिक बळकट करण्यासाठी मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशिका देण्याबाबत राबविण्यात येत असलेल्या VPMS प्रणालीसाठी मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे यांच्या कंपनीतर्फे कार्यरत असलेल्या १६ कंत्राटी कर्मचारी यांनी दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक ३१.०३.२०२४ या कालावधीसाठी केलेल्या कामाचे मानधन व व्यवस्थापन खर्च यासाठी येणा-या खर्चापोटी रु.२४,३८,७१६/- (रुपये चोवीस लक्ष अडतीस हजार सातशे सोळा फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवर होणारा खर्च गृह विभाग मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, १०८ राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५००९७) ५०- इतर खर्च-दत्तमत या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. याकरिता पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण प्राधिकारी म्हणून आणि त्यांच्या कार्यालयातील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे या कंपनीसोबत नियमानुसार करार करण्यात आलेला आहे. सदर कराराच्या अटी व शर्तीच भंग होणार नाही याची त्यांनी दक्षता घ्यावी लागेल. अटी व शर्तीचा भंग झाल्यास, सदर कंत्राट रद्द करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१८१२३४४४२५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN SAHEBRAO DHIKALE

Digitally signed by PRAVIN SAHEBRAO DHIKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6d1bb8a730bc70c2cbcd0b01bab78ae17bc671feb580bcbbcd692fb0650b8855, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5958E733FEF41BD5DDD91B20A6E0AC739E081BB933D0189686449BE15147182, cn=PRAVIN SAHEBRAO DHIKALE
Date: 2024.03.18 12:44:13 +05'30'

**( प्रविण सा. ढिकले )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
३) पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई
४) मे.सुमित फॅसिलिटिज लि., सुमित हाऊस, २ रा मजला, प्लॉट नं.६४/२१, डी-II, एम.आय.डी.सी., चिंचवड, पुणे-४११ ०१९.
५) महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.